**"शिक्षक प्रशिक्षण" या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता पुरवणी मागणी अंतर्गत केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२०२ आय १६५ ) आणि राज्य हिस्सा (२२०२ आय २५४) खाली निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६ / प्र.क्र.०२ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख:- १८ फेब्रुवारी, २०१७.

वाचा -

१) वि. वि,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) केंद्र शासन, मानव संसाधन विकास मंत्रालय यांचे पत्र क्र.एफ नं.४४-१७ /२०१६-EE-९, दिनांक ०८-०८-२०१६.
४) शालेय शिक्षण विभागाची नस्ती क्र. अनुवि-४११६ / ( ८४/१६ )/ प्रशिक्षण.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१- प्राथमिक शिक्षण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०४) शिक्षकांना प्रशिक्षण( २२०२ आय १६५ ) केंद्र हिस्सा तसेच (०१) (०५) शिक्षकांना प्रशिक्षण ( २२०२ आय २५४ ) राज्य हिस्सा या लेखाशिर्षाखाली डिसेंबर, २०१६ च्या अधिवेशनात रु.२५४.५२ लक्ष इतक्या निधीची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आलेली आहे.

या अर्थसंकल्पित निधीपैकी वाचा क्र. ३ नुसार केंद्र शासनाने वितरीत केलेला रु. १५२.७१ लाख आणि समरुप राज्य हिस्सा रु. १०१.८१ लाख असे एकुण रु. २५४.५२ लाख ( रुपये दोन कोटी चोपन्न लाख बावन्न् हजार फक्त ) इतका निधी (०१) (०४) शिक्षकांना प्रशिक्षण( २२०२ आय १६५ ) केंद्र हिस्सा तसेच (०१) (०५) शिक्षकांना प्रशिक्षण ( २२०२ आय २५४ ) राज्य हिस्सा या लेखाशिर्षाखाली प्रशासकीय विभाग / नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना वाचा क्र. १ व २ मधील अटी व शर्तींची पुर्तता करत असल्याने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. **उपरोक्त वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत करण्याची तसेच त्यानुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधीच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी**.

३. सदर वितरीत निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) खर्चासाठी नियंत्रक अधिकारी यांना सुपूर्द करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी वितरित निधीच्या मर्यादेत तसेच शासन पत्र आदिवासी विकास विभाग क्रमांक अशाशा २०११/ प्र.क्र. ५९ / का.११, दि. १९ जानेवारी, २०१२ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०१६ / प्र.क्र.८९ / अर्थ-३, दि.२०.०४.२०१६ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६ /प्र.क्र.३१/ कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १७/ अर्थ-१९, दिनांक ०४-०२-२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१८१११२२४५१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.02.20 17:06:21 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग ( अर्थ-१९ ) / ( व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.